सु-सुधारित प्रशासकीय मान्यता
न्यायमूर्तीनगर, औरंगाबाद येथील उच्च न्यायालयाच्या आवारात मा. न्यायमूर्ती यांचेकरीता ६ बंगल्यांचे बांधकाम करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२२२/प्र.क्र.४६/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय , मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २५ एप्रिल, २०२२

**पहा :-**

१) मा.प्रबंधक (निरिक्षणे-२),मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू)१६२६/१९८१(३४)/ ५८४/७८३८, दिनांक ४ मार्च, २०२२.

२) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.सीसीबी-१२१४/६९०/प्र.क्र.४१४/का-१३, दिनांक २३ नोव्हेंबर, २०१७.

३) शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.सीसीबी-११२०/प्र.क्र.४६/का-१३, दिनांक १ डिसेंबर, २०२०.

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये न्यायमूर्तीनगर, औरंगाबाद येथील उच्च न्यायालयाच्या आवारात मा. न्यायमूर्ती यांचेकरीता ६ बंगले बांधण्यासाठी रु.१३,८७,४६,०००/- इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर सदर कामास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये रु.२१,४९,२७,१५७/- इतक्या रकमेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ येथील मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या पत्रान्वये न्यायमूर्तीनगर, औरंगाबाद येथील उच्च न्यायालयाच्या आवारात मा. न्यायमूर्ती यांचेकरीता ६ बंगले बांधण्यासाठी रु.२८,३२,२७,४८७ /- इतक्या अंदाजित खर्चाचा सु-सुधारित (Re-revised) प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे सदरहू प्रस्तावास सु-सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

न्यायमूर्तीनगर, औरंगाबाद येथील उच्च न्यायालयाच्या आवारात मा. न्यायमूर्ती यांचेकरीता ६ बंगल्यांचे बांधकाम करण्याकरीता रु.२७,११,००,०००/- (रुपये सत्तावीस कोटी अकरा लक्ष फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सु-सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | बांधकामाचा खर्च | १३,३८,६९,७४८/- |
| २ | अंतर्गत विद्युतीकरण (५%) | ५१,४२,०४४/- |

| | | |
|---|---|---|
| ३ | बाह्य विद्युतीकरण (६%) | २४,१६,२३२/- |
| ४ | पाणी पुरवठा मल:निस्सारण (बांधकाम खर्चाच्या ५%) | ४,०९,३३५/- |
| ५ | संरक्षक भिंत | ९,२६,५५८/- |
| ६ | अंतर्गत रस्ते | १५,३०,१९०/- |
| ७ | सोलार एनर्जी | ४,९२,४९७/- |
| ८ | रेन वॉटर हार्वेस्टींग | ४,४१,५१०/- |
| ९ | अग्नीशमन यंत्रणा | १,८८,१७९/- |
| १० | भूविकास | ११,६३,५८६/- |
| ११ | फर्निचर | १,९९,६३,३९८/- |
| १२ | भाववाढ | १,४१,३४,६६७/- |
| १३ | वातानुकुलीत यंत्रणा | ७०,०१,६०६/- |
| १४ | बागबगीचा | २,९९,४२३/- |
| १५ | पोलीस कॅबीन | २७,०६,३१६/- |
| १६ | इ.आय.आर.एल. १ | ३,४१,८८,१९१/- |
| १७ | इ.आय.आर.एल. २ | १,३३,१६,८४४/- |
| १८ | इ.आय.आर.एल. (इलेक्ट्रिकल) | ३७,२२,९१३/- |
| १९ | वस्तू नि सेवा कर (अ.क्र.१ ते ११ व १५ ते २२) | २,९१,४४,१८१/- |
| | **एकुण** | **२७,१०,५८,४८७/-** |
| | **एकूण प्रकल्प खर्च** | **रु.२७.११ कोटी** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

१) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

२) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/ तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

५) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/ प्र.क्र.६०/ इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

६) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

७) अंदाजपत्रकीय कामात बदल होणार नाही.

८) सार्वजनिक बांधकाम विभागातील अभियंत्यांनी तोंडी दिलेल्या सूचनांच्या आधारावर कामाच्या व्याप्तीत बदल किंवा नवीन कामे समाविष्ट करु नये.

९) नवीन कामांचा समावेश करावयाचा झाल्यास किंवा व्याप्तीत बदल करावयाचा झाल्यास, याबाबत लेखी आदेश प्राप्त करुन विहित मुदतीत व पद्धतीने सदर कामांना मंजूरी घकण्याची कार्यवाही करावी. अन्यथा संबंधित अधिकाऱ्यावर जबाबदारी निश्चित करण्यात येईल.

१०) **विधि व न्याय विभाग, शासन पत्र, क्र. सीआरक्यू-१२२२/प्र.क्र.४६/का-१३, दिनांक ६ एप्रिल, २०२२ मधील बाबींची पूर्तता करण्याची जबाबदारी सार्वजनिक बांधकाम विभागाची असेल.**

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७००, इतर गृहनिर्माण (०१), न्यायदान-केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा), (०१)(०१) मोठी बांधकामे, ५३-मोठी बांधकामे (कार्यक्रम), (४२१६०२९१) व न्यायदान-केंद्र पुरस्कृत योजना (केंद्र हिस्सा), (०३)(०४) मोठी बांधकामे, ५३-मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. **मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, अनौपचारिक संदर्भ क्रमांक : ४३/ २०२२/ इमा-२, दिनांक १० मार्च, २०२२ आणि **मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सचिव समितीच्या दिनांक २८ मार्च, २०२२ रोजी झालेल्या बैठकीत समितीने दिलेल्या मान्यतेनुसार** व वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/का-१३, विनियम,भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक. २०२२०४२५१३३९०३८०१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2022.04.25 13:40:39 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२)मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३)मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.

४)मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,
५) मा.प्रबंधक (निरीक्षणे-२) अपिल शाखा, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
६) मा.प्रबंधक, खंडपीठ औरंगाबाद, मा.उच्च न्यायालय, मुंबई,
७)महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
९)अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, औरंगाबाद.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम (पश्चिम) विभाग, औरंगाबाद.
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११) उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम (विशेष प्रकल्प) विभाग क्र.२, औरंगाबाद.
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग (ईमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१५) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.